**क्रीडा व युवक सेवा संचालनालयाच्या मंजूर आकृतिबंधातील "क्रीडा मार्गदर्शक" (अराजपत्रीत, गट ब) हे पद “गट अ” च्या श्रेणीमध्ये उन्नत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : खेआक्ष-३३१८/प्र.क्र.१५१(भाग-१)/क्रीयुसे-२,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ३१ जानेवारी, २०१९

<u>वाचा</u> :- (१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
क्रमांक-खेआक्ष १५१७/प्र.क्र.१५१/क्रीयुसे-२,दिनांक ०५ सप्टेंबर,२०१८

<u>प्रस्तावना</u> :-

राज्याचे नाव उज्ज्वल केलेल्या अत्युच्च गुणवत्ताधारक खेळाडूंना शासकीय सेवेत थेट नियुक्ती देण्याबाबतची कार्यपध्दती दिनांक ९ डिसेंबर,२०१० च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेली आहे. सदर कार्यपद्धतीनुसार कार्यवाही करताना मा.मुख्य सचिव महोदयांच्या अध्यक्षतेखाली पार पडलेल्या दिनांक १४ मार्च,२०१८ च्या बैठकीत, श्री सुयश जाधव व श्रीमती. कांचनमाला पांडे हे दिव्यांग खेळाडू गट-अ मधील नियुक्तीसाठी पात्र ठरत असले तरीही या खेळाडूंना जलतरण खेळासाठी “क्रीडा मार्गदर्शक” म्हणून नियुक्ती दिल्यास ते उत्तम प्रशिक्षक ठरू शकतील त्यामुळे गट- अ च्या पदाची अर्हता धारण करणाऱ्या सदर खेळाडूंना क्रीडा मार्गदर्शक, गट-ब (रु.९३००-३४८०० ग्रेड पे ४३००) या पदावर नियुक्ती देऊन त्यांचे पद वर्ग अ च्या पदाच्या रु.१५६००-३९,१०० ग्रेड पे ५४०० या श्रेणीत उन्नत करण्याची शिफारस करण्यात आली होती .सदर शिफारस मा.मुख्यमंत्री महोदयांनी मान्य केल्याने संदर्भाधीन शासन निर्णयान्वये त्यांना क्रीडा मार्गदर्शक पदी नियुक्ती देण्यात आली आहे. आता सदर खेळाडूंच्या नियुक्तीचे “क्रीडा मार्गदर्शक” हे पद गट-अ या पदाच्या वेतनश्रेणीत श्रेणीउन्नत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>**शासन निर्णय**</u> :

क्रीडा व युवक सेवा संचालनालयाच्या आस्थापनेवरील रु.९३००-३४८०० ग्रेड पे रु.४३०० या वेतनश्रेणी मधील "क्रीडा मार्गदर्शक" या संवर्गातील दोन पदे,सदर पदावर उपरोक्त नमूद अधिकारी सेवेमध्ये असेपर्यंत रु.१५६००-३९,१०० ग्रेड पे रु.५४०० या गट-अ च्या वेतन श्रेणीमध्ये,खेळाडूंच्या थेट नियुक्तीच्या दिनांकापासून श्रेणी उन्नत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४५/व्यय-५, दिनांक ११.०१.२०१९ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१९०१३१११०३२५१४२१ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2019.01.31 11:15:49 +05'30'

( राजेंद्र पवार )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

(१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
(२) मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक
(३) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
(४) सचिव,वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई
(५) आयुक्त, क्रीडा व युवकसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
(६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
(७) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
(८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर
(९) मा.मंत्री (क्रीडा) यांचे विशेष कार्य अधिकारी
(१०) निवड नस्ती (क्रीयुसे-२)